**वर्कप्लॅन अंतर्गत केंद्र पुरस्कृत तृणधान्य विकास कार्यक्रम सन २०११ - १२ मध्ये राबविण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक-तृधावि-१६११ /प्र.क्र. १५२/४-अे,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई ४०००३२.**
**दिनांक :- ३० जून, २०११**

**संदर्भ :- १**) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्रमांक- तृविका १६१०/प्र.क्र.-१८८/४-अे, दिनांक २८ जून,२०१०, ३१ जुलै, २०१० व २५ जानेवारी, २०११
२) केंद्र शासन, कृषि मंत्रालय, कृषि व सहकार विभाग,नवी दिल्ली यांचे पत्र क्रमांक ६-६/२०११- एमएम-१ , दिनांक ६ मे, २०११ व १२ मे, २०११
३) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. कृआ/तृधावि/कृति. आ./ २७११ / विप्र -१ / २५८/ २०११, दिनांक :- ०९ जून, २०११
४) कृषि व पदुम विभाग कार्यासन २-अे यांची दि.२७.६.२०११ ची टिप्पणी

**प्रस्तावना:-**

केंद्रीय कृषि मंत्रालयाच्या संदर्भाधिन दिनांक ६ मे, २०११ च्या पत्रान्वये सन २०११-१२ मध्ये वर्कप्लॅन मधील योजनांना प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. या योजनांमध्ये केंद्र पुरस्कृत तृणधान्य विकास कार्यक्रम या योजनेचा समावेश आहे. या योजनेच्या निधीत केंद्र व राज्य हिस्साचे प्रमाण ७५:२५ असे आहे. या योजनेकरिता केंद्र शासनाने त्यांच्या संदर्भाधीन दि. ६ मे, २०११ च्या पत्रान्वये रू. ८००.०० लक्ष ( रू. आठ कोटी फक्त ) च्या निधीस प्रशासकीय मान्यता व केंद्र शासनाच्या पहिल्या हप्त्याच्या हिश्श्यापोटी रू. १८७.५० लक्ष ( रू. एक कोटी सत्याऐंशी लाख पन्नास हजार फक्त ) निधीस वित्तीय मान्यता देण्यात आली आहे. केंद्र शासनाने मान्यता दिलेल्या रू. ८००.०० लाख ( केंद्र हिस्सा ६००.०० लाख व राज्य हिस्सा २००.०० लाख ) निधीस प्रशासकीय मान्यता व पहिल्या हप्त्याच्या केंद्र हिश्श्यापोटी वितरित केलेल्या रु. १८७.५० लाख निधीच्या कार्यक्रमास वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

सन २०११-१२ या वर्षासाठी केंद्र शासनाने त्यांचे संदर्भाधीन पत्र दिनांक ६ मे, २०११ च्या पत्रान्वये केंद्र पुरस्कृत तृणधान्य विकास कार्यक्रम सन २०११-१२ मध्ये राज्यात राबविण्यासाठी रु. ८००.०० लक्ष (रुपये आठ कोटी फक्त) एवढ्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता दिली आहे. त्याचप्रमाणे केंद्र शासनाच्या पहिल्या हप्त्यापोटी रू. १८७.५० लाख ( रू. एक कोटी सत्याऐंशी लाख पन्नास हजार फक्त) निधीस वित्तीय मान्यता देण्यात आली आहे. केंद्र शासनाची मान्यता लक्षात घेवून केंद्र पुरस्कृत तृणधान्य विकास कार्यक्रम राज्यात सन २०११-१२ मध्ये राबविण्यासाठी एकूण रुपये ८००.०० लाख (रु. आठ कोटी फक्त) निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय व रू. १८७.५० लाख ( रू. एक कोटी सत्याऐंशी लाख पन्नास हजार फक्त) निधीच्या कार्यक्रमास शासनाची वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

राज्य हिश्याच्या जिल्हा नियोजन व विकास समितीच्या अखत्यारितील तरतुदीस प्रशासकीय वित्तीय मान्यता देण्याचे अधिकार संबंधित जिल्हाधिकारी यांना आहेत. या योजनेबाबतच्या मार्गदर्शक सुचना संबधित जिल्हाधिकारी यांना उपलब्ध करून देण्यात याव्यात. सदर कार्यक्रमाची भौतिक व आर्थिक उद्दिष्टे व अनुदानाचा दर सोबतच्या परिशिष्ट "अ" मध्ये दर्शविण्यात आला आहे. या योजनेसाठी मंजूर केलेला निधी पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०११-१२ च्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

**(रू. लाखांत)**

**अ) मागणी क्रमांक - डी -३,**

**२४०१ पीक संवर्धन , १०२ अन्नधान्य पिके,**

**(केंद्र हिस्सा ७५ टक्के)**

**(००)(११) केंद्र पुरस्कृत योजना - तृणधान्य विकास कार्यक्रम**

**(२४०१ ३०९१) ३३ अर्थसहाय्य. ( १६०.५०)**

**ब) मागणी क्रमांक-डी -३, २४०१ पीक संवर्धन १०२ , अन्नधान्य पिके,**

**महाराष्ट्र जिल्हापरिषद. परिषद व पंचायत समिती अधिनियम १९६१ च्या**

**कलम १२३ अन्वये जिल्हा परिषदांना अनुदान (स्थानीक क्षेत्रातील योजना)**

**(अर्थोपाय आगाऊ रकमांशी समायोज्य )**

**(केंद्र हिस्सा) जिल्हा परिषदांना अर्थसहाय्य**

**(००)(२५) एकात्मिक तृणधान्य विकास कार्यक्रम.**

**(२४०१ ४६१४) ३१- सहाय्यक अनुदान ( २७.०० )**

२. या कार्यक्रमासाठी मंजूर केलेला निधी खर्च करण्यास **संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे** यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे, तसेच मंजूर निधीचे जिल्हा निहाय वितरण करण्यास **संचालक (विस्तार व प्रशिक्षण),कृषि आयुक्तालय, पुणे** यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. या योजनेचा खर्च मासिक कॅश फ्लोच्या मर्यादेत राहील याची दक्षता घेण्याची व संगणकीय अर्थसंकल्पीय प्रणालीद्वारे वितरीत करण्याची जबाबदारी **संचालक (विस्तार व प्रशिक्षण) कृषि आयुक्तालय, पुणे** यांची राहील.

३. केंद्र पुरस्कृत तृणधान्य विकास कार्यक्रमाच्या उद्दिष्ट पूर्तीसाठी संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी केंद्र शासनाच्या संदर्भाधीन दिनांक ६ मे, २०११ च्या पत्रान्वये निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना विचारात घेवून उद्दिष्ट निहाय सविस्तर मार्गदर्शक सूचना सर्व क्षेत्रीय अधिका-यांना निर्गमित कराव्यात. या मार्गदर्शक सूचना निर्गमित करतेवेळी पुढील प्रमुख बाबी अंतर्भूत करण्यात याव्या.

i) या योजनेंतर्गत प्रति शेतकरी/ बाब अनुदानाची कमाल मर्यादा २५ टक्के इतकी राहील.

ii) लाभार्थी निवडतांना अनुसूचित जाती / जमाती व भटक्या विमुक्त जाती / जमाती संवर्गातील लाभार्थी यांना प्राधान्य देण्यात यावे व अशा लाभार्थ्यांना देण्यात आलेल्या लाभाबाबत स्वतंत्र नोंदी ठेवाव्यात.

iii) मंजूर निधीपैकी अनुसूचित जाती / जमातीसाठी लोकसंख्येच्या प्रमाणात निधी खर्च करण्यात यावा.

iv) प्रत्येक जिल्हयाच्या विस्तार व फलोत्पादन आराखडयामध्ये या योजनेचा अंतर्भाव गरजेनुसार ठेवण्यात यावा.

v) **या योजनेचे मूल्यमापन त्रयस्थ यंत्रणेकडून ( Third Party Evaluation ) करुन घ्यावे.**

vi) वैयक्तीक लाभार्थी निवडतांना महिला लाभार्थींना प्राधान्य देण्यात यावे. असे लाभार्थी उपलब्ध न झाल्यास इतरांची निवड करण्यात यावी. महिला लाभार्थ्यांना देण्यात आलेल्या लाभाची स्वतंत्र नोंद ठेवण्यात यावी.

vii) सन २०१०-११ मध्ये लाभ घेतलेल्या व २०११-१२ मध्ये वैयक्तिक लाभ दिलेल्या लाभधारकांची यादी तालुका कार्यालये / पंचायत समिती / जिल्हाधिकारी कार्यालयात लावण्यात यावी तसेच ती यादी कृषि विभागाच्या वेब साईटवर देखील देण्यात यावी.

४. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे या योजनेचा मासिक आर्थिक व भौतिक प्रगती अहवाल प्रत्येक महिन्याला विहित मुदतीत केंद्र शासनाला तसेच राज्य शासनाला सादर होईल याची दक्षता घेण्यात यावी.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक-९८ /११ / व्यय-१, दिनांक २३ जून, २०११ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करून देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक **२०११०७०५१२४६२३००१** असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**(वि.मा.बिवलकर)**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती).
संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, पुणे.(१० प्रती)
सर्व संचालक / सहसंचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१.
विभागीय आयुक्त (सर्व),
विभागीय कृषि सहसंचालक (सर्व).
जिल्हाधिकारी (सर्व) (बृहन्मुंबई व मुंबई उपनगर हे जिल्हे वगळून)
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व))(बृहन्मुंबई व उपनगर हे जिल्हे वगळून)
जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व))(बृहन्मुंबई व उपनगर हे जिल्हे वगळून)
कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व) )
व्यवस्थापकीय संचालक, कृषि उद्योग विकास महामंडळ मर्यादित,आरे दुग्ध कॉलनी ,गोरेगांव(पूर्व),मुंबई ६५.
मुख्य लेखा व वित्त अधिकारी,जिल्हा परिषद(सर्व)
व्यवस्थापकीय संचालक, कृषि उद्योग विकास महामंडळ मर्यादित, आरे दुग्ध कॉलनी ,गोरेगांव(पूर्व),मुंबई ६५.
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, महाबीज भवन,कृषि नगर,अकोला.
संचालक,लेखा व कोषागारे,संगणक कक्ष,नवीन प्रशासकीय भवन,पाचवा मजला,मंत्रालयासमोर,मुंबई(२प्रतीत).
महालेखापाल (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२,मुंबई / नागपूर.
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई.
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय,मुंबई.
सामाजिक न्याय, क्रिडा व विशेष सहाय्य विभागा, मंत्रालय, मुंबई ३२.
आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई ३२.
वित्त विभाग, व्यय-१, अर्थसंकल्प-१३,
सर्व सह सचिव / उप सचिव / अवर सचिव /कार्यासन अधिकारी, कृषि व पदुम विभाग (कृषि व फलोत्पादन)
मा.मंत्री(कृषि) यांचे खाजगी सचिव.
मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव.
निवड नस्ती.

**शासन निर्णय क्र. तृधावि - १६११/ प्र.क्र. १५२/ ४अे**
**दिनांक:- ३० जून, २०११**
**परिशिष्ट - अ**

| केंद्र पुरस्कृत तृणधान्य विकास कार्यक्रम सन २०११-१२ चा कार्यक्रम | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| अ. क्र. | बाब | अनुदानाचा दर | परिमाण | लक्ष | |
| | | | | भौतिक लक्ष | आर्थिक लक्ष |
| १ | क्षेत्रिय पिक प्रात्यक्षिके | सुधारित भात पिकासाठी रु.२५००/- प्रति प्रात्यक्षिक ०.४० हेक्टर क्षेत्रासाठी | संख्या | ३०१४ | ७५.३५ |
| | | संकरित भात तंत्रज्ञानाची प्रात्यक्षिके रु.३०००/- प्रति प्रात्यक्षिक ०.४० हेक्टर क्षेत्रासाठी | संख्या | १०२२ | ३०.६५ |
| | | गहू व इतर तृणधान्य प्रात्यक्षिके रु.२०००/- प्रति प्रात्यक्षिक ०.४० हेक्टर क्षेत्रासाठी | संख्या | ११३०० | २२६.०० |
| २ | बियाणे वाण बदल- बियाणे वितरण भात व गहू | रू. ५/- प्रति किलो किंवा किंमतीच्या ५० टक्के यापैकी जे कमी असेल ते | क्विंटल | ४६७१६ | २३३.५८ |
| ३ | सुक्ष्म मूलद्रव्यांच्या वापरासाठी प्रोत्साहनपर अर्थसहाय्य (सुक्ष्म मूल द्रव्यांच्या कमतरता असणाऱ्या क्षेत्राकरिता) | रू. ५००/- प्रति हेक्टर किंवा रकमेच्या ५० टक्के यापैकी जे कमी असेल ते | हेक्टर | ७४०० | ३७.०० |
| ४ | गहू पिकास अम्लधर्मीय जमिनीत चुनाकळीच्या वापरासाठी अर्थसहाय्य | रू. ५००/- प्रति हेक्टर किंवा रकमेच्या ५० टक्के यापैकी जे कमी असेल ते | हेक्टर | ७४०० | ३७.०० |
| ५ | पीक संरक्षण रासायनिक आणि जैविक औषधेच्या वापरासाठी अर्थसहाय्य (भात पिकासाठी) | रू. ५००/- प्रति हेक्टर किंवा रकमेच्या ५० टक्के यापैकी जे कमी असेल ते | हेक्टर | ७४०० | ३७.०० |
| ६ | शेतकरी शेतीशाळा अंतर्गत शेतकरी प्रशिक्षण | रु. १७०००/- प्रति प्रशिक्षण (पूर्ण रक्कम ) | संख्या | ७२६ | १२३.४२ |
| **एकूण** | | | | | ८००.०० |
| **केंद्र हिस्सा** | | | | | ६००.०० |
| **राज्य हिस्सा** | | | | | २००.०० |